**ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य ग्रंथालय सेवा-गट-अ**
**<u>या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत......</u>**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मराग्रं-२५११/प्र.क्र.७९/२०१५/साशि-५**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ७ जुलै, २०१५.

**संदर्भ** : १) शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २९.६.२०१५
२) कार्यालयीन आदेश क्र.मराग्रं-२५११/प्र.क्र.८७/२०१४/साशि-५, दिनांक १५.५.२०१४
३) श्री. किरण धांडोरे, यांचे दिनांक ७.७.२०१५ चे पत्र

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत श्री.किरण गंगाधर धांडोरे, यांची ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य ग्रंथालय सेवा-गट-अ, (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ७६००), ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई, या पदावर ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील, त्या दिनांकापासून दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीसाठी संदर्भाधीन १ येथील शासन निर्णयान्वये नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली आहे.

सद्य:स्थितीत ग्रंथालय संचालक पदाचा अतिरिक्त कार्यभार शासन आदेश दिनांक १५.५.२०१४ अन्वये श्री.सु.हि.राठोड, उपसंचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, यांच्याकडे दि.१.५.२०१४ पासून सोपविण्यात आला आहे.

श्री. किरण गंगाधर धांडोरे, यांनी ग्रंथालय संचालक पदावर दिनांक ७.७.२०१५ (म.पू.) रोजी रुजू होत असल्याबाबत संदर्भाधीन क्र.३ येथील पत्रान्वये शासनास कळविले आहे. श्री. धांडोरे यांना ग्रंथालय संचालक पदी दिनांक ७.७.२०१५ (म.पू.) पासून रुजू करुन घेण्यात येत आहे. श्री.सु.हि. राठोड, यांच्याकडे सोपविण्यात आलेला ग्रंथालय संचालक पदाचा अतिरिक्त कार्यभार संपुष्टात आणण्यात येत आहे.

श्री. सु.हि. राठोड, उपसंचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, यांनी त्यांचेकडे असलेला ग्रंथालय संचालक पदाचा अतिरिक्त कार्यभार श्री.किरण गंगाधर धांडोरे, ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य यांचेकडे तात्काळ सोपवावा व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकतेस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०७०८१६२६४३०७०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra Vishnu Jadhav

Digitally signed by Rajendra Vishnu Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Vishnu Jadhav
Date: 2015.07.08 16:38:37 +05'30'

**( राजेंद्र वि. जाधव )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. श्री. किरण गंगाधर धांडोरे, ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. श्री. सु.हि.राठोड, उपसंचालक तथा प्र.ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

**प्रत,**

१) मा.प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा ), मुंबई/नागपूर
३) संचालक, लेखा व कोषागरे
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
६) सर्व जिल्हाधिकारी
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८) सर्व सहाय्यक ग्रंथालय संचालक, }
९) ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय, मुंबई }
१०) ग्रंथपाल, सर्व शासकीय विभागीय ग्रंथालये, } ग्रंथालय संचालनालयामार्फत
११) ग्रंथपाल, डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मृति ग्रंथालय, दापोली, }
१२) ग्रंथपाल, सर्व शासकीय जिल्हा ग्रंथालये }
१३) निवडनस्ती (साशि-५)